अनुसूचित जाती व नवबौध्द घटकाच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करणेबाबत (२०१४-१५)

# महाराष्ट्र शासन

## सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः एसटीएस-२०१४/प्र.क्र.११३/अजाक-१

मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०००३२

तारीख: ३१ मार्च, २०१५

<u>वाचा</u>

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. एसटीएस-२०११/प्र.क्र.४३९/अजाक-१ दिनांक ६/१२/२०१२

२) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्र. एसटीएस-२०११/प्र.क्र.४३९/अजाक-१ दिनांक ६/२/२०१३

३) शासन पत्र क्र. एसटीएस-२०११/प्र.क्र.१९१/अजाक-१ दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१३

४) आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.क्र.सकआ/ अजाउयो-१/मिनी ट्रॅक्टर/अति. मागणी/२०१४-१५/१९४ दिनांक २४/०३/२०१५

## शासन निर्णय

अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहायता बचत गटांना ९० टक्के अनुदानावर मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचा पुरवठा करण्याचा निर्णय शासन निर्णय दिनांक ६/१२/२०१२ अन्वये घेतला आहे. सदर योजनेच्या अंमलबजावणीबाबत शासन निर्णय, दिनांक ६/२/२०१३ अन्वये कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. या योजनेंतर्गत पुरवठा करावयाचा मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांच्या खरेदीची कमाल किंमत रु.३.५० लाख इतकी ठेवण्यात आली आहे. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात प्रस्तुत योजनेसाठी रु.३०००.०० लाख निधी उपलब्ध करुन देण्यात आला होता. सदर निधीमधून ९४६ मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांची खरेदी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या. मुंबई या शासन अंगीकृत संस्थेकडून करण्यात आली आहे.

या व्यतिरिक्त प्रस्तुत योजनेसाठी सन २०१४-१५ या आर्थीक वर्षात रु.६१७.४० लाख इतका अतिरिक्त निधी पुनर्विनियोजनाद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. सदर अतिरिक्त निधीतून सन २०१४-१५ या आर्थिक वर्षासाठी अतिरिक्त १९६ मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांची खरेदी महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळ मर्या. मुंबई या शासन अंगीकृत संस्थेकडून करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. मिनी ट्रॅक्टर व त्याची उपसाधने यांचे जिल्हानिहाय उद्दीष्ट सोबतच्या विवरणपत्रात नमूद केल्याप्रमाणेजोडण्यात येत आहे.

३. यासाठी आयुक्त, समाज कल्याण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणुन नियुक्त करण्यात येत आहे.

४. यासाठी होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात केलेल्या तरतूदीतून व पुढील लेखाशिर्षातून करण्यात यावा:-

**मागणी क्रमांक ३**
२२२५ अनुसूचित जाती. अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग यांचे कल्याण
०१ अनुसूचित जातीचे कल्याण
१०२ आर्थिक विकास
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना (विघयो)
०४ उपकरणे व यंत्रसामुग्रीसाठी अर्थसहाय्य
(०४)(०१) अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना मिनी ट्रॅक्टर पुरविणे (विघयो) (२२२५ D३३१)
३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर)

५. त्यानुसार जिल्हा कार्यालयात प्राप्त प्रलंबित असलेल्या बचत गटांची निवड करण्यात यावी. त्यानंतर शिल्लक राहिल्यास आलेल्या अर्जामधुन लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.३३७/२०१५/व्यय १५, दिनांक २७ मार्च, २०१५ नुसार दिलेल्या मान्यतेने निर्गमीत करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३३१११५२३५९३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: CN = Siddharth Amrutrao Zalte, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE
Date: 2015.04.04 11:07:10 +05'30'

**(सिध्दार्थ झाल्टे)**
**अवर सचिव**

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सहआयुक्त, समाज कल्याण (अनुसूचित जाती उपयोजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
३) उपसचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई
४) उपसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

५) उपसचिव. कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई

६) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण

७) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ , मुंबई

८) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, गट-अ

९) सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद

१०) मा. मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

११) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर

१३) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/पुणे

१४) सर्व जिल्हा कोषाकार अधिकारी

१५) लेखा व कोषागरे संचालनालय, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई

निवड नस्ती, अजाक

## विवरणपत्र

शासन निर्णय क्रमांक एसटीएस-२०१४/प्र.क्र.११३/अजाक-१, मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०००३२ दिनांक ३१/३/२०१५ चे सहपत्र.
(अनुसूचित जाती व नवबौध्द घटकांच्या स्वयंसहाय्यता बचत गटांना अनुदानावर पुरवठा करावयाचा मिनी ट्रॅक्टर व उपसाधनांबाबत जिल्हानिहाय उद्दीष्ट)

| अ.क्र. | जिल्हा | उद्दीष्ट |
|---|---|---|
| १ | अहमदनगर | २५ |
| २ | कोल्हापूर | ७७ |
| ३ | जालना | ४० |
| ४ | बीड | ४० |
| ५ | पुणे | १४ |
| | **एकुण** | १९६ |

Siddharth Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: CN = Siddharth Amrutrao Zalte, C = IN, S = MAHARASHTRA, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = SOCIAL JUSTICE & SPECIAL ASSISTANCE
Date: 2015.04.04 11:07:48 +05'30'

**(सिध्दार्थ झाल्टे)**
**अवर सचिव**